**बॅण्ड महोत्सव आयोजन खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२५/प्र.क्र.१२२(ई.नं.१०११४१८)/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ३१ मार्च, २०२५

**संदर्भ :-** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२५/ प्र.क्र.१२२(ई.नं.१०११४१८)/सां.का.४, दि. २७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

विविध सांस्कृतिक कार्यक्रम व उपक्रमांचे आयोजन विभागामार्फत करण्यात येते. आधुनिक काळात या लोप पावत चाललेल्या लोककलांचे जतन व संवर्धन करण्याच्या दृष्टीने शासनाच्या वतीने विविध महोत्सवाचे आयोजन दरवर्षी करण्यात येते. बॅण्ड हा प्रामुख्याने महाराष्ट्राच्या संस्कृतीचा एक प्रमुख भाग असून अत्यंत आनंदाच्या क्षणी सणांमध्ये विवाह सारख्या कार्यामध्ये बॅण्डचा वापर केला जातो. जेणेकरून मंगलमय वातावरणाची निर्मिती होते. महाराष्ट्रात वेगवेगळ्या प्रकारचे बॅण्ड असून सुर सनई, पोलीस बॅण्ड, ब्रास बॅण्ड, महिला बॅण्ड इत्यादी प्रकार प्रसिद्ध आहेत. बॅण्ड महोत्सवाच्या माध्यमातून सांस्कृतिक क्षेत्रात प्रथमच अशा आगळ्यावेगळा महोत्सव आयोजित करण्याचे संचालनालयाने प्रस्तावित केले आहे. बॅण्ड महोत्सवाच्या आयोजन खर्चास उपर्निर्दिष्ट सदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता सदर कार्यक्रम आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात “बॅण्ड महोत्सव” या महोत्सवाच्या आयोजनाकरीता येणाऱ्या अंदाजित खर्च रुपये ४०,००,०००/- (अक्षरी रुपये चाळीस लक्ष फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०२), राज्य, नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७)-५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०४. सदर प्रकरणी मंजूर करण्यात आलेली रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता लेखा अधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य,

मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या रकमेची देयके संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयाच्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा (VPDA) द्वारे आहरित करण्यासाठी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथे सादर करुन विहित प्रणालीद्वारे संबंधितांना वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व दि. १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३३१२२००४१९८२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.31 22:01:15 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४